**<u>रोजगार हमी योजना/महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण</u>**
**रोजगार हमी योजना कामांवर झालेल्या**
**भ्रष्टाचार/गैरप्रकारांच्या संदर्भात करावयाची**
**शिस्तभंग विषयक कार्यवाहीची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : रोहयो २०२३/प्र.क्र.४९/रोहयो-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मे, २०२३.

**<u>वाचा:</u>**- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : ११८९/प्र.२७५/इएमपी-१ मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दि.२२/०२/१९९०.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक- रोहयो १०९३/प्र.क्र.११३/रोहयो-२, दि.४/११/१९९३.
३) नियोजन विभाग, अधिसुचना दि.४/०७/२०१४ महाराष्ट्र तक्रार निवारण, २०१४ मध्ये दि.२४/०४/२०२३ अन्वये केलेली सुधारणा.

**<u>प्रस्तावना:-</u>**

महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम १९७७ मधील तरतुदीनुसार रोहयो/मग्रारोहयो अंतर्गत सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच जिल्हयातील योजनेच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा कार्यक्रम समन्वयक म्हणून जिल्हाधिकारी काम पाहतात. रोहयो/ मग्रारोहयोची कामे ही राज्यामध्ये यंत्रणांद्वारे आणि विशेष करून ग्रामपंचायतीद्वारे तालुका पातळीवर मोठया प्रमाणात करण्यात येतात. सदर कामे होत असताना काही वेळा अनियमितता अथवा गैरव्यवहार घडतात. जिल्हा कार्यक्रम समन्वयक हे जिल्हाधिकारी असल्याने कामातील अनियमिततेबाबत चौकशीची प्रकरणे जिल्हाधिकारी व त्यांच्या नियंत्रणाखालील यंत्रणेला पाठवली जातात.

२. राज्यात मग्रारोहयो अंमलात आली तेव्हा मनरेगा अंतर्गत किमान ५० टक्के रकमेची कामे पंचायत राज संस्थेमार्फत करणे बंधनकारक होते. हे प्रमाण जास्तीत जास्त असावे. तसेच जिल्हा परिषद पंचायत समिती तसेच ग्रामपंचायत यंत्रणेचे जिल्हास्तरीय प्रमुख मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद असून ते मग्रारोहयोचे सह कार्यक्रम समन्वयक सुध्दा आहेत.

३. तसेच संदर्भ क्र.३ अन्वये शासनाने महाराष्ट्र तक्रार निवारण, २०१४ दि.२४/०४/२०२३ च्या अधिसुचनेद्वारे नियमात सुधारणा केली असून त्यानुसार महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ अंतर्गत सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत शासकीय सेवकाच्या बाबतीत शिस्तभंगाची कारवाई सुरू करेल आणि अशासकीय सेवकाच्याबाबतीत त्यांची तात्काळ सेवा समाप्त करून आर्थिक गैरव्यवहारातील रक्कम वसूल करण्यात येईल. अशा दखलपात्र गुन्हयाचा प्रथम माहिती अहवाल दाखल करण्यासाठी शासनाची पुर्व परवागनी घेतली आहे याची तो खात्री करेल अशी तरतूद करण्यात आली आहे.

४.	मग्रारोहयो अंतर्गत केली जाणारी कामे अचूक व पारदर्शी राहण्यासाठी नरेगा संगणकीय प्रणालीमध्ये सन २०१५ पासून नरेगासॉफ्ट, सन २०१९ पासून सेक्युअर ॲपलिकेशन व सन २०२१ पासून जिओ टॅगिंग ॲपलिकेशन इत्यादी या कामात अंमलात आणल्याने पारदर्शकता व अचूकता राहिल्यामुळे अनियमिततेच्या व गैरव्यवहाराच्या प्रमाणात घट झाली आहे. या सर्व बाबींचा विचार करून शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे-

**परिपत्रकः-**

जिल्हापरिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतच्या मग्रारोहयो अंतर्गत कामाबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी हे नियंत्रक अधिकारी असतात. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम, १९७७ मधील तरतुदीनुसार रोहयो/मग्रारोहयो अंतर्गत कामावरील गैरप्रकार/भ्रष्टाचार/अनियमिततेबाबत तक्रारी आल्यास त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे कार्यवाही करावयाची आहे-

२.	एखाद्या अधिकाऱ्याविरुध्द/ कर्मचाऱ्याविरुध्द आरोप करणारी तक्रार आल्यावर त्या अधिकाऱ्याविरुध्द/कर्मचाऱ्याविरुध्द प्राथमिक चौकशी करुन त्या आधारे त्या अधिकारी/ कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी करण्याची आवश्यकता भासल्यास चौकशी समिती गठीत न करता प्राथमिक चौकशी अहवाल तयार करावे. प्रशासकीय अधिकाऱ्यामार्फत प्राथमिक चौकशी करून चौकशी अहवाल पुढील कार्यवाहीसाठी शासनास सादर करण्यात यावा. तसेच चौकशी अहवाल तयार करणे व दोषारोप पत्रे तयार करणे ही कामे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी करावीत.

३.	संदर्भ क्रमांक १ अन्वये रोहयो/मग्रारोहयो अंतर्गत असलेल्या कामावर झालेल्या गैरव्यवहार/ भ्रष्टाचार/अनियमितता संदर्भात विभागीय आयुक्त यांना अट क्र.२ नुसार शिस्तभंग विषयक प्राधिकारी म्हणून नेमण्यात आले आहे. तसेच अट क्र. ६ नुसार विभागीय आयुक्त हे महाराष्ट्र नागरी सेवा ( शिस्त व अपिल ) नियम १९७९ च्या नियम ६(३) नुसार शिस्तभंगविषयक प्राधिकारी असल्याने वर्ग-१ व वर्ग-२ च्या अधिकाऱ्यांसह (रु.६६००/- ग्रेड पे पर्यंत) सर्व वर्गातील शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्यासंदर्भात निलंबनाचे आदेश काढू शकतात असे नमूद आहे. यापुढे खालीलबाबतीत शासनाची पुर्व मान्यता घेणे आवश्यक राहील-

१) जिल्हा परिषदेच्या अधिपत्याखालील अनियमिततेस जबाबदार असलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे निलंबन/पुनर्स्थापना करावयाची असल्यास,
२) अनियमिततेस जबाबदार असलेले अधिकारी व कर्मचारी यांच्याविरूध्द विभागीय चौकशी प्रस्तावित करावयाची असल्यास,
३) जिल्हा परिषद अधिपत्याखालील कार्यरत असलेले अधिकारी व कर्मचारी यांच्याबाबतीत शास्ती द्यावयाची असल्यास,

४. प्रस्तावनेमध्ये परिच्छेद क्र.४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे मग्रारोहयो अंतर्गत कामामध्ये संगणकीय प्रणालीचा वापर करून पारदर्शकता व अचूकता राहील्यामुळे अनियमितता, गैरव्यवहार व भ्रष्टाचाराच्या प्रकरणाबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक म्हणून वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत यंत्रणेशी वर नमूद केलेल्या निगडीत कामाबाबत महसूल यंत्रणेतील तहसिलदार, उपविभागीय अधिकारी व जिल्हाधिकारी यांच्याकडे तक्रारी प्राप्त झाल्यास त्यावर कार्यवाही करण्यासाठी त्या संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांकडे वर्ग करावीत. विभागीय आयुक्त यांनी वरील सुचनेनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५१६१५०५५५४११६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKUMAR VERMA

Digitally signed by NANDKUMAR VERMA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cf f487862cc567ee39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DCD3577EBF0E05E2A8B57095C152DC6CFB37C2BB 83DA197788645DD8A362EBC5, cn=NANDKUMAR VERMA
Date: 2023.05.16 15:08:31 +05'30'

**( नंद कुमार )**

अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
४) निवडनस्ती (रोहयो-२).